**गुणवत्ता दर्जा सुधार योजनेंतर्गत पीएच.डी.करण्याकरीता प्रतिनियुक्तीवर पाठविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांकः प्रतिनि-३५२३/प्र.क्र.१८/२३/तांशि-७**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०९ मे, २०२३.

**संदर्भ:**

१. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक-प्रतिनि-३५२०/प्र.क्र.९९/२०/तांशि-७, दि.२४/०२/२०२१.
२. संचालक, तंत्रशिक्षण यांचे पत्र क्र.४अ/आस्था-३/तंत्रनिकेतने-क्यूआयपी/२०२३-२४/१०४, दि.१७/०२/२०२३.

**शासन आदेश:**

शासकीय तंत्रनिकेतनातील खालील तक्त्यात नमूद केलेल्या अधिव्याख्यात्याची गुणवत्ता दर्जा सुधार योजनेंतर्गत उच्च शिक्षणासाठी (पीएच.डी. अभ्यासक्रम) सन २०२३-२०२४ या शैक्षणिक वर्षापासून ०३ (तीन) वर्षे कालावधीसाठी त्यांचे नावासमोरील संस्थेमध्ये निवड झालेली आहे.

| अ. क्र | अध्यापकाचे नाव व पदनाम | कार्यरत असलेल्या संस्थेचे नाव | पीएच.डी. करीता प्रवेश घेतलेल्या संस्थेचे नाव |
|---|---|---|---|
| १. | श्री. मोहन सुधाकर खेडकर, अधिव्याख्याता, माहिती तंत्रज्ञान | शासकीय तंत्रनिकेतन, नाशिक | वीरमाता जीजाबाई तंत्रज्ञान संस्था, मुंबई |

२. संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये गुणवत्ता दर्जा सुधार योजेनेंतर्गत शासकीय अभियांत्रिकी/औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालये, शासकीय तंत्रनिकेतने व अशासकीय अनुदानित अभियांत्रिकी महाविद्यालये यामधील अध्यापकांना उच्च शिक्षणाकरीता प्रतिनियुक्तीवर पाठविण्यासाठी सुधारीत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. सदर मार्गदर्शक सुचनांनुसार अध्यापकांना पीएच.डी अभ्यासक्रमाकरीता प्रतिनियुक्तीवर पाठविण्यासाठीची पात्रता, प्रतिनियुक्तीवर जाण्यासाठी उमेदवारांस प्रवेश मिळालेल्या संस्थांचे प्राधान्यक्रम निश्चित करण्यात आले आहेत. सदरच्या पात्रता/निकष व प्राधान्यक्रम विचारात घेऊन व संचालक, तंत्रशिक्षण यांच्या स्तरावर गठीत करण्यात आलेल्या निवड समितीच्या शिफारशीस अनुलक्षून, उपरोक्त अध्यापकास सन २०२३-२४ या शैक्षणिक वर्षापासून ०३ वर्षांच्या कालावधीसाठी पीएच.डी अभ्यासक्रमाकरीता प्रतिनियुक्तीवर पाठविण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

३. संबंधित अध्यापकास प्रतिनियुक्तीसाठी कार्यमुक्त करण्यापूर्वी संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयामधील अ.क्र. १(अ) (९) नुसार अध्यापकाकडून हमीपत्र घेण्याची दक्षता संचालक, तंत्रशिक्षण यांनी घ्यावी. सदर अध्यापकास संस्थेतून कार्यमुक्त केल्याच्या दिनांकापासून त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी सुरु होईल.

४. संबंधित अध्यापकास संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयामधील अ.क्र. १(अ)(७) ते (१४) येथील अटी व शर्ती लागू राहतील.

५. संबंधित अध्यापकाने पीएच.डी अभ्यासक्रम पूर्ण केल्यानंतर संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयामधील अ.क्र.४ येथे नमूद “अपेक्षित उपक्रम” या शीर्षाखाली नमूद उपक्रम/जबाबदा-या पूर्ण करणे आवश्यक आहे. सदर जबाबदा-या पूर्ण केल्या आहेत किंवा कसे याचा वस्तुनिष्ठ अहवाल प्रतिवर्षी संबंधित अध्यापकाने स्वयंमूल्यनिर्धारण अहवालासोबत जोडणे आवश्यक राहील व त्याची नोंद सदर अहवालात प्रतिवर्षी घेतली जाईल.

६. असे प्रमाणित करण्यात येते की, उपरोक्त अध्यापकास गुणवत्ता दर्जा सुधार कार्यक्रमानुसार पीएच.डी. अभ्यासक्रमासाठी प्रतिनियुक्तीवर पाठविण्यात आले नसते तर, वरील अभ्यासक्रमाच्या काळात ते त्याच पदावर स्थानापन्न राहीले असते.

७. सदर आदेश सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०५०९१५५७१३३८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SAMEER LAXMAN DHERE

Digitally signed by SAMEER LAXMAN DHERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=e6ab4a357b0e2247b4328b57f45f509bf1bf0bd20c865128a018421c354bddc5, pseudonym=B0341853BBBDA46EBB328D4BE0F460D863592476, serialNumber=6EE64CF9B42881125C3715A5DB341B5827C5743C728BC85F04BB71FF8FC154D6, cn=SAMEER LAXMAN DHERE
Date: 2023.05.09 15:57:44 +05'30'

**(समीर ढेरे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति:**

संबंधित अधिव्याख्याता (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)

**प्रत:-**

१) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२) सहसंचालक, विभागीय कार्यालय, नाशिक (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत),
३) प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, नाशिक (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत),
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
५) जिल्हा कोषागार आधिकारी, नाशिक (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत),
६) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
७) निवड नस्ती-तांशि-७.